2004071910

**"३ जानेवारी" हा दिवस "सावित्रीबाई फुले स्त्री-मुक्ती दिन" म्हणून साजरा करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन परिपत्रक क्र.संकीर्ण-२००३/प्रक्र. ३३९ /का-२**
**नविन प्रशासन भवन, बी विंग,**
**मादाम कामा रोड, मुंबई-३२.**
**दि. २४ .१२.०३**

**वाचा :- शासन परिपत्रक, मवबावि.क्र.संकीर्ण-२००२/प्रक्र.४०७/का-२, दि. २३ डिसेंबर, २००२.**

**परिपत्रक** :- स्त्री-पुरुष समानतेसाठी सतत झगडणाऱ्या पुण्यासारख्या सनातनी शहरात समाजाचा छळ सहन करुन स्त्री शिक्षणक्षेत्रांत अमोल कार्य केलेल्या, स्त्री-मुक्ती आंदोलनाच्या प्रणेत्या- श्रीमती सावित्रीबाई फुले यांचा दिनांक "३ जानेवारी" हा जन्मदिवस "सावित्रीबाई फुले स्त्री मुक्ती दिन" म्हणून शासकीय स्तरावरुन प्रतिवर्षी साजरा करण्यासबंधीच्या सूचना उपरोक्त शासन परिपत्रकान्वये दिलेल्या आहेत.

२. मागील वर्षाप्रमाणेच, आगामी **दि.३ जानेवारी, २००४** हा दिवस **"सावित्रीबाई फुले स्त्री-मुक्ती दिन"** म्हणून साजरा करण्यात यावा व या दिवसाचे महत्व लक्षांत घेऊन या प्रसंगी उचित कार्यक्रमांचे आयोजन करण्यात यावे व याकरिता :-

१. सावित्रीबाई फुले यांच्या जन्मदिवशी राज्यातील सर्व शाळेत मुलांची प्रभात फेरी काढावी, त्यांच्या फोटोस पुष्पहार घालून मानवंदना करावी, त्यांच्या शैक्षणिक कार्यावर वक्तृत्व, निबंध, चित्रकला स्पर्धा आयोजित कराव्यात. त्याच दिवशी सर्व शाळांमधून विविध सांस्कृतिक कार्यक्रम आयोजित करावे. तसेच, राज्यातील सर्व अध्यापक विद्यालयात अशा प्रकारचे कार्यक्रम आयोजित करावेत. या सर्व कार्यक्रमांमध्ये शाळेतील शिक्षकांनी देखील सहभागी व्हावे. वरील सर्व कार्यक्रम आयोजित करण्यासाठी शिक्षणाधिकारी (प्राथमिक / माध्यमिक ) यांच्या स्तरावरुन सर्व शाळांना सूचना देण्यात याव्यात.

२. राज्यातील सर्व विद्यापिठे, महाविद्यालये व इतर तांत्रिक संस्था यांचा या विषयाशी व स्त्री मुक्ती दिनाचे महत्व लक्षात घेवून हा कार्यक्रम आयोजित करावेत.

३. राज्यात ठिकठिकाणी महिला मेळावे आयोजित करुन महिलांच्या जागृतीसाठी प्रबोधनात्मक कार्यक्रमांचे आयोजन करण्यात यावेत. राज्य/केंद्र शासनामार्फत महिलांच्या विकासासाठी राबविण्यांत येणाऱ्या योजना / कार्यक्रमांची माहिती महिलांना देण्यात यावी. हुंडा निर्मुलन, देवदासी प्रथा निर्मुलन इ. सारख्या कार्यक्रम आयोजित करावेत.

४. सध्या समाजात महिलांबाबत ज्या अनिष्ठ रुढी /परंपरा आहेत, त्यांचे उच्चाटन करण्यासाठी, तसेच, महिलांमध्ये त्यांच्या हक्कांची जाणीव होण्यासाठी, महिलांवर होणारे अत्याचार / हिंसा याला प्रतिबंध होण्याचेदृष्टीने अनेक कार्यक्रमांचे आयोजन करण्यात यावेत,

५. या दिवशी वर नमुद केल्याप्रमाणे जे विविध कार्यक्रम राज्यात ठिकठिकाणी आयोजित करण्यात येतील त्या कार्यक्रमांना वृत्तपत्रे , आकाशवाणी, दूरदर्शन इत्यादी प्रसिध्दी माध्यमांद्वारे प्रसिध्दी देण्यात यावी,

६. जिल्हा स्तरावर -मा.पालकमंत्री /पालक सचिव यांच्या उपस्थितीत प्रमुख कार्यक्रम आयोजित करण्यात यावेत.

३. वर नमूद केल्याप्रमाणे विविध कार्यक्रमांचे आयोजन करण्यासाठी जो काही अल्प प्रमाणात खर्च होईल तो खर्च संबधित शासकीय / निमशासकीय / स्वयंसेवी संस्था हयांनी आपल्या अनुदानातील आकस्मिक खर्चामधून करण्यात यावा.

४. जिल्हयामध्ये वरीलप्रमाणे कार्यक्रमांचे आयोजन सर्व जिल्हाधिकारी यांनी करावे व त्याबाबतचा अहवाल शासनास पाठविण्यात यावा. जिल्हयातील सर्व विभाग प्रमुखांनी या कार्यक्रमासाठी पूर्ण सहकार्य करावे. सर्व विभागांनी आपल्या नियंत्रणाखालील कार्यालयांना योग्य त्या सूचना द्याव्यात.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( ज.न.राठोड )
शासनाचे उप सचिव

प्रती,
मा.राज्यपालांचे सचिव
मा.मुख्यमंत्र्यांचे सचिव
मा.उप मुख्यमंत्र्यांचे सचिव
सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
सर्व विभागीय आयुक्त
सर्व जिल्हाधिकारी
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
सर्व मंत्रालयीन विभाग
महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई
आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना आयुक्तालय, कोकण भवन, मुंबई
व्यवस्थापकीय संचालक, महिला आर्थिक विकास महामंडळ, मुंबई
सचिव, महाराष्ट्र राज्य समाज कल्याण सल्लागार बोर्ड, मुंबई
सर्व जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी
निवड नस्ती, का-२.